**<u>सर्व महानगरपालिका आयुक्त यांनी सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या कालावधीतील गोपनीय अहवाल लिहिताना स्वच्छ महाराष्ट्र अभियान अंतर्गत करण्यात आलेल्या प्रगतीचा स्पष्ट उल्लेख करण्याबाबत व गोपनीय अहवालात नोंद घेण्याबाबत</u>.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक: एमसीओ-२०१७/प्र.क्र.१९(१)/नवि-१४**

मंत्रालय, मुख्य इमारत, चौथा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३० जानेवारी, २०१७

**संदर्भ:-** उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.सीपीएफ-१०१६/ प्र.क्र.७७४/२०१६/दहा, दि.२२.१२.२०१६.

**<u>प्रस्तावना</u>:-**

संदर्भाधीन पत्रान्वये सामान्य प्रशासन विभागाने अशा सूचना दिल्या आहेत की, महाराष्ट्र संपूर्ण हगणदारीमुक्त करण्याची कार्यवाही जलदपणे व प्रभावीपणे होण्याच्या दृष्टीने क्षेत्रीय अधिकाऱ्यांवर त्याची जबाबदारी निश्चित करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने सर्व जिल्हा परिषद मुख्य कार्यकारी अधिकारी, महानगरपालिका आयुक्त व मुख्याधिकारी, नगरपरिषद यांच्या सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या कालावधीतील गोपनीय अहवालांमध्ये या योजनांमध्ये केलेल्या प्रगतीचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. या अनुषंगाने आवश्यक ते निदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त सूचनांस अनुसरून असे स्पष्ट करण्यात येत आहे की, राज्यातील सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा दि.३१.०३.२०१७ पर्यंत हगणदारीमुक्त करण्याचे उद्दिष्ट देण्यात आले आहे. त्यादृष्टीने हगणदारीमुक्तीचे उद्दिष्ट जलदगतीने व प्रभावीपणे साधता यावे, म्हणून सर्व महानगरपालिका आयुक्त यांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, **त्यांनी सन २०१६-१७ या कालावधीतील गोपनीय अहवाल लिहिताना यासाठी करण्यात आलेल्या प्रगतीचा स्पष्ट उल्लेख करावा.**

या अनुषंगाने पुढे असेही नमूद करण्यात येत आहे की, महानगरपालिका आयुक्तांना देण्यात आलेल्या K.R.A. (Key Result Areas) मध्ये हगणदारीमुक्तीचे उद्दिष्टाचा उल्लेख करण्यात आला आहे. सदर बाब विचारात घेऊन सर्व महानगरपालिका आयुक्तांनी या संदर्भात प्रभावीपणे कार्यवाही करणे आवश्यक आहे.

**२. तसेच सर्व महानगरपालिका आयुक्तांना असेही सूचित करण्यात येते की, ज्या महानगरपालिका दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत हगणदारीमुक्त म्हणून घोषित करण्याची / प्रमाणित करुन घेण्याची कार्यवाही पूर्ण करतील. अशांच्या बाबतीत संबंधित आयुक्तांच्या गोपनीय अहवालात त्यांच्या उल्लेखनीय कामगिरीबद्दल अनुकुल शेरे नोंदविण्यात येतील.**

**तसेच ज्या महानगरपालिकांच्या बाबतीत त्या दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत त्या हगणदारीमुक्त म्हणून घोषित करण्याची/प्रमाणित करून घेण्याची कार्यवाही न झाल्यास संबंधित आयुक्तांच्या गोपनीय अहवालात प्रतिकुल शेरे नोंदविण्यात येतील.**

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०१३०१६४७१२९३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.01.30 16:48:24 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
३. उप सचिव, नगर विकास विभाग/नवि-३४, मंत्रालय, मुंबई.
४. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, द्वारा महाराष्ट्र नागरी सुविधा विकास कंपनी म., तळमजला, सीआर-२, बॅ.रजनी पटेल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई.
५. विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव.
६. निवडनस्ती (नवि-१४).